**राज्यातील पाळीव प्राणी कुत्रे, मांजरे, पांढरे उंदिर इत्यादी प्राण्यांकरिता स्मशानभूमीची व्यवस्था करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**नगर विकास विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. औचित्य - २०२३ /प्र.क्र.२३३/नवि-२०**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक २५ एप्रिल, २०२५**

**प्रस्तावना :-**

श्री.प्रताप सरनाईक, विधानसभा सदस्य यांनी विधानमंडळात दिनांक २५ जुलै, २०२३ रोजी "राज्यातील पाळीव प्राणी कुत्रे, मांजरे,पांढरे उंदिर इत्यादी प्राण्याकरिता स्मशानभुमीची व्यवस्था करावी" या विषयासंदर्भात औचित्याचा मुद्दा उपस्थित केला होता. राज्यातील काही स्थानिक नागरी स्वराज्य संस्था मनुष्य स्मशानभुमीच्या शेजारी राखीव जागेत तर काही स्थानिक नागरी स्वराज्य संस्था घनकचरा व्यवस्थापन केंद्राच्या शेजारी राखीव जागेत पाळीव प्राण्यांच्या अंत्यविधीची व्यवस्था करतात. स्मशानभूमीच्या शेजारी जागेत पाळीव प्राण्याच्या अंत्यविधी केल्यास धार्मिक, सामाजिक तेढ निर्माण होण्याची शक्यता आहे. पाळीव प्राण्यांचा अंत्यविधी करताना योग्य दक्षता न घेतल्यास दुर्गंधी व आजार पसरण्याची शक्यता नाकारता येत नाही. तसेच त्या राखीव जागेत इतर मृत्य प्राणी फेकण्याची शक्यता आहे. यास्तव पाळीव प्राण्याच्या अंत्यविधीकरिता घनकचरा व्यवस्थापन केंद्राच्या शेजारी जागा उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र राज्यात प्राणी-मित्र कुत्रे, मांजर, पांढरे उंदिर, इतर गौवंशीय प्राणी इत्यादी पाळीव प्राणी पाळले जातात. पाळीव प्राण्यांची वयोमर्यादा कमी असते व त्यांच्या मृत्यृनंतर मृत्यृ प्राणी खाडी, तलाव, मोकळया जागा,पाण्याचे डबके किंवा रस्त्यावर फेकले जातात. मृत्यृ प्राण्यांच्या शरीराची योग्य विल्हेवाट न केल्यास दुर्गंधी पसरुन रोगराई पसरण्याचा धोका असतो. त्यामुळे नागरिकांना मोठया त्रासाला सामोरे जावे लागते. उपरोक्त पार्श्वभुमीवर राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापन केंद्राच्या शेजारी पाळीव प्राण्याच्या अंत्यविधीसाठी जागा उपलब्ध करुन दयावी. त्याबाबत खालील मार्गदर्शक सुचनांची अंमलबजावणी राज्यातील सर्व महानगरपालिका / नगरपरिषदा /नगरपंचायती यांनी करणे आवश्यक आहे.

१) राज्यातील सर्व महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायती यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापन केंद्राच्या शेजारी जागा पाळीव प्राण्यांच्या अंत्यविधीसाठी उपलब्ध करावी.
२) देण्यात येणाऱ्या जागेस संरक्षक भिंत व सुरक्षा व्यवस्था असावी.
३) मृत्य प्राण्यांचे अंत्यविधी करताना योग्य ती दक्षता घेण्यात यावी जेणे करुन त्यातून दुर्गंधी निर्माण होणार नाही. त्यामुळे इतर आजार पसरणार नाहीत त्यांची दक्षता संबंधित नागरी स्वराज्य संस्थां यांनी घ्यावी.

४) मृत्य पाळीव प्राणी इतर ठिकाणी टाकले जाणार नाही यांची दक्षता राज्यातील सर्व नागरी स्वराज्य संस्थां यांनी घ्यावी.

५) राज्यातील नागरी स्वराज्य संस्थांनी ठरावीक शुल्क आकारुन पाळीव प्राण्यांच्या अंत्यविधीसाठी परवानगी देण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४२५१२२४०७८८२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJINKYA VASANT BAGADE

Digitally signed by AJINKYA VASANT BAGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Urban Development Department, 2.5.4.20=c2c536d8c69638eb0722b58787e3271291abd492dd102db87dd9f19890bb74ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6c08d792cf36e8c4debdaff51291af7fa70ad1cabea48c176da37b5a461cb674, cn=AJINKYA VASANT BAGADE
Date: 2025.04.25 12:24:48 +05'30'

**(अजिंक्य बगाडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) सर्व सन्मानीय विधानसभा / विधानपरिषद सदस्य
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास विभाग) यांचे खाजगी सचिव
४) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
६) राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
७) आयुक्त तथा संचालक,नगरपरिषद प्रशासन संचालनायल,बेलापुर,नवी मुंबई
८) राज्यातील सर्व नगरपरिषदा / नगरपंचायती यांचे मुख्याधिकारी
९) निवडनस्ती (नवि-२०)